भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन करण्याबाबत.

पुणे व औरंगाबाद जिल्ह्यातील टिपण नकाशांचे स्कॅनिंग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राभूअ -२०१६/ प्र. क्र. २७८/ ल-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख : ८ फेब्रुवारी, २०१९

वाचा - १) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक: राभूअ-२०१४/प्र .क्र.१८२/ल-१, दिनांक ०६/०६/२०१४

२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण १०११/२०१३/प्र .क्र.६१८/ल-१, दिनांक ०६/१०/२०१५

३) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे पत्र क्र. पु.मो-१/प्र.क्र. १०८/२०१८ दि. ०६/१२/२०१८,

**प्रस्तावना:-**

राज्यात महसूल व भूमि अभिलेख विभागाकडील जुन्या कागदपत्रांचे स्कॅनिंग करण्याचा प्रकल्प संदर्भाधीन दि. ०६/०६/२०१४ च्या तसेच मूळ भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन संदर्भाधीन दि. ६/१०/२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुरू आहे. त्याअनुषंगाने औरंगाबाद जिल्ह्यामध्ये स्कॅनिंगचे काम मे. रिको इंडिया लि. या संस्थेमार्फत करण्यात आलेले आहे. परंतु या संस्थेने केलेल्या कामाची गुणवत्ता चांगली नसून स्कॅनिंग टिपणांचा वापर डिजीटायझेशनसाठी करताना अडचणी येत असल्याबाबत मे. आय. आय. सी. टेक्नॉलॉजीज लिमिटेड व मे. आय. एल. ॲण्ड एफ. एस. इन्व्हायरलमेंटल इन्फ्रास्ट्रक्चर ॲण्ड सर्व्हीसेस लिमिटेड या संस्थेने कळविलेले आहे असे संदर्भीय जमाबंदी आयुक्तांच्या पत्रावरून स्पष्ट होते. उपरोक्त दोन्ही संस्था मे. रिको इंडिया लि. यांना देय असलेल्या दरामध्ये टिपणांचे स्कॅनिंग करण्यास तयार असल्याबाबतही जमाबंदी आयुक्तांनी कळविले आहे. त्यामुळे उपरोक्त स्कॅनिंग केलेल्या कामाची गुणवत्ता चांगली नसल्यामुळे मे. रिको इंडिया लि. यांना मोबदला न देता, सदर टिपणांचे दुबार स्कॅनिंग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१. भूमि अभिलेख विभागातील या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठ अ मध्ये नमुद पुणे व औरंगाबाद या जिल्ह्यातील टिपणांचे दुबार स्कॅनिंग अनुक्रमे १) मे. आय. एल. ॲण्ड एफ. एस. इन्व्हायरलमेंटल इन्फ्रास्ट्रक्चर ॲण्ड सर्व्हीसेस लिमिटेड व २) मे. आय. आय. सी. टेक्नॉलॉजीज लिमिटेड यांच्या मार्फत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. परिशिष्ठ अ मध्ये नमुद पुणे व औरंगाबाद जिल्ह्यातील टिपणांच्या स्कॅनिंगचे काम मे. रिको इंडिया लि. या संस्थेने विहीत पध्दतीने न केल्यामुळे त्यांना सदरची रक्कम न देता सदरची रक्कम दुबार स्कॅनिंग करणाऱ्या संस्थांना देण्यात यावी.

३. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०८१६५९५७७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2019.02.08 17:01:41 +05'30'

**(डॉ. संतोष भोगले)**
**सह सचिव,**
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
४. वित्त विभाग, कार्यासन व्यय १०/ अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई
५. कार्यासन ब१/ब२ महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती कार्यासन ल-१, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

# परिशिष्ठ अ

| अ. क्र | जिल्हा | तालुका | एकूण टिपणांची संख्या | मे. रिको इंडिया लि. यांना A४ साईज स्कॅनिंगसाठी ठरवुन दिलेला दर रुपये | एकूण देय रक्कम रुपये | दुबार स्कॅनिंग करणाऱ्या संस्थेचे नांव |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | पुणे | पुरंदर | ३८६२४ | ०.७९ | ३०,५१२.९६ | मे. आय. एल. ॲण्ड एफ. एस. इन्व्हायरलमेंटल इन्फ्रास्ट्रक्चर ॲण्ड सर्व्हीसेस लिमिटेड |
| | | भोर | १६१०६ | ०.७९ | १२,७२३.७४ | |
| | | दौंड | १२७८१ | ०.७९ | १०,०९६.९९ | |
| | | शिरुर | ६५६४९ | ०.७९ | ५१,८६२.७१ | |
| | | हवेली | ५९१ | ०.७९ | ४६६.८९ | |
| | | जुन्नर | २५९८७ | ०.७९ | २०,५२९.७३ | |
| | | *मावळ* | *४४६९१* | *०.७९* | *३५,३०५.८९* | |
| | | बारामती | १५११० | ०.७९ | ११,९३६.९ | |
| | | इंदापुर | १४३९६ | ०.७९ | ११,३७२.८४ | |
| | | वेल्हे | २७५७९ | ०.७९ | २१,७८७.४१ | |
| | **एकूण** | | **२६१५१४** | | **२,०६,५९६.०६** | |
| २ | औरंगाबाद | संपुर्ण जिल्हा | १६८१३९ | १.०३ | **१,७३,१८३.१७** | मे. आय. आय. सी. टेक्नॉलॉजीज लिमिटेड |
| | **एकूण** | | | | **३,७९,७७९.२३** | |